**डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गांवांतील दलित वस्त्यांचा सर्वांगीण विकास करणे कवलापूर, ता.मिरज, जि.सांगली**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दवसु-२०१८/प्र.क्र.९२/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १४ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: सान्यावि-२०१५/ प्र. क्र.१६३/ बांधकामे, दिनांक ०९ ऑक्टोबर,२०१५.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:दवसु-२०१६/प्र. क्र.१५६/ अजाक, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:दवसु-२०१६/प्र. क्र.२२७/ अजाक, दिनांक २६ ऑक्टोबर,२०१६.
४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र, क्रमांक: सकआ/ मावक/ अजानबौघवि/निअजानबौ/डॉबाआं१२५जयंती/२०१८/का-१२/१९८२, दिनांक ८ मार्च, २०१८.

**प्रस्तावना:**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गावांतील दलित वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याचा निर्णय शासनाने उपरोक्त वाचा २ अन्वये घेतलेला आहे. सदर निर्णयांतर्गत “कवलापूर, ता.मिरज, जि.सांगली” येथील दलित वस्तीचा समावेश उपरोक्त वाचा ३ अन्वये करण्यात आलेला आहे. यास अनुसरून कवलापूर, ता.मिरज, जि.सांगली येथील दलित वस्तीच्या विकासाचा कार्यकारी अभियंता ( इ. व द.), जिल्हा परिषद सांगली यांनी तयार केलेला खालील प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर केलेला आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | अनुसूचित जातीच्य वस्तीमधील अंतर्गत रस्ते, खडीकरण, डांबरीकरण व आर. सी. सी. गटारीचे बांधकाम करणे | २०,६३,९१,५०० |
| २. | सौर व विद्युत दुहेरी पंप बसविण्याबाबत | १८,०४,०७२ |
| ३. | बौध्द समाजमंदिर, आंगणवाडी इमारत, व्यायामशाळा व परिसर सुशोभिकरण करणे | १,२५,३०,५०४ |
| ४. | मिळकत क्रमांक १/२ चर्मकार वस्तीमध्ये हॉल बांधणे | ५७,४७,२३० |
| ५. | अनुसूचित जाती व नवबौध्द वस्तीमध्ये पथदिवे बसविणे | १५,४१,६८७ |
| ६. | दलित वस्ती, चर्मकार वस्तीमध्ये स्ट्रीट पोलवरील एल. ई. डी. दिवे बसविणे तसेच आवश्यक विद्युतीकरण करणे | ११,०७,६८४ |

| | | |
|---|---|---|
| ७. | मिळकत क्रमांक १५३/२३१ मधील स्मशानभूमि दुरुस्ती व सुशोभिकरण करणे | ४८,०३,०३६ |
| ८. | मिळकत क्रमांक २९३/४४४ मध्ये नरसोबा मंदिर सभा मंडप व परिसर सुधारणा करणे | १६,९१,३६० |
| ९. | मिळकत क्रमांक ५७,२/७८५, २/१७२, ४/१०६/ब, ४/२६०/अ, ४/३९१/२, १/२, २/१७३/२ मधील आंगणवाडया दुरुस्ती व परिसर सुशोभिकरण करणे. | १५,०७,९५० |
| १०. | मिळकत क्रमांक ४४४/७५८, गट नंबर २४१२ मध्ये बौध्द समाजमंदिर, सुसज्ज सभागृह व इतर सोयीसुविधा करणे | ६,९५,६३,४८० |
| ११. | मिळकत क्रमांक ४८१/८८४ मध्ये स्मशानभूमी दुरुस्ती व परिसर सुशोभिकरण करणे | ४,८०,९५५ |
| | **एकूण** | ३०,७१,६९,४५८ |

(अक्षरी रुपये तीस कोटी एकाहत्तर लक्ष एकोणसत्तर हजार चारशे अठ्ठावण्ण फक्त)

सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त १२५ निवडक गावांतील दलित वस्त्यांचा सर्वांगिण विकास करण्याच्या निर्णयास अनुसरुन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कवलापूर, ता.मिरज, जि.सांगली येथील अनुसूचित जाती व नवबौध्द वस्ती विकासाच्या सादर केलेल्या प्रस्तावातील खालीलप्रमाणे कामांचा रुपये २,१४,६२,७५९/- (रुपये दोन कोटी चौदा लक्ष बासष्ट हजार सातशे एकोणसाठ फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | सौर व विद्युत दुहेरी पंप बसविण्याबाबत | १८,०४,०७२ |
| २. | बौध्द समाजमंदिर, आंगणवाडी इमारत, व्यायामशाळा व परिसर सुशोभिकरण करणे | १,२५,६०,००० |
| ३. | मिळकत क्रमांक १/२ चर्मकार वस्तीमध्ये हॉल बांधणे | ५५,५७,००० |
| ४. | अनुसूचित जाती व नवबौध्द वस्तीमध्ये पथदिवे बसविणे | १५,४१,६८७ |
| | **एकुण** | २,१४,६२,७५९ |

अ. सदर प्रस्तावातील कामांचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा, तसेच विस्तृत नकाशास शासनाने नियुक्त केलेल्या वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब सदर प्रकरणी शासन निर्णय दि.१२.८.२०१६ मधील परिच्छेद ६ नुसार सदर कामे सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत करण्यात यावीत.

क. निधी वितरणाच्या मार्गदर्शक सुचना समाजकल्याण आयुक्तस्तरावरुन देण्यात याव्यात.

२. सदर प्रस्तावावर होणारा खर्च हा मागणी क्रमांक एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९- अनुसूचित जाती घटक योजना,०२-भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजना-दत्तमत), लेखाशिर्ष-२२२५-डी-८२३ या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-१९ या वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२३१७१५१०२६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.08.23 17:18:49 +05'30'

(दि.रा.डिंगळे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, पुणे विभाग, पुणे
३. कार्यकारी अभियंता (इ. व द.), जिल्हापरिषद, सांगली
४. श्री. स.रा.पाटील, वास्तुशास्त्रज्ञ, उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे कार्यालय, पुणे
५. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, सांगली
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) -१,महाराष्ट्र, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती /अजाक.